**दि. १.१.२००१ रोजी किंवा त्यानंतर निवड प्रक्रिया सुरु होणाऱ्या गट 'अ' गट 'ब' गट 'क' मधील पदावरील सेवाभरतीसाठी आणि सध्या शासकीय सेवेत असलेल्यांसाठी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत घेतल्या जाणाऱ्या चाचणी परीक्षेचे प्रमाणपत्र संगणक विषयक शैक्षणिक अर्हता म्हणून निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण २०००/प्रक्र५/२००१/३९**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**मंत्रालय,मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: ४ ऑक्टोबर, २००२**

**वाचावे:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण १०००/प्रक्र१४३/३९,दि. १०.७.२०००**
**२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण २००१/प्रक्र ६१/२००१/३९, दि. ७.८.२००१**
**३)शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण २०००/प्रक्र५/२००१/३९, दि. २०.७.२००१**

**प्रस्तावना:-**

शासकीय कामकाजात संगणकाचा मोठया प्रमाणात वापर होण्यासाठी शासन मान्य अशा ५ संगणक संस्थामार्फत शासकीय खर्चाने शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक प्रशिक्षण देण्याची योजना सन १९९८ मध्ये सुरु करण्यांत आली. या योजनेच्या प्रगतीचा २ वर्षानंतर आढावा घेतल्यानंतर याबाबत प्राप्त झालेल्या सूचनांचा सखोल अभ्यास करुन ५ संगणक संस्थांची मान्यता दि. १०.७.२००० च्या निर्णयान्वये रद्द करुन या योजनेंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्यांची चाचणी परीक्षा घेण्याचा निर्णय घेण्यांत आला.

वरील निर्णयानंतर दि. १.१.२००१ रोजी किंवा त्यानंतर निवड प्रक्रीया सुरु होणाऱ्या पदांवरील सेवाभरतीसाठी तसेच सध्या शासकीय सेवेत असलेल्यांसाठी दि. ७.८.२००१ च्या शासन निर्णयान्वये संगणक विषयक शैक्षणिक अर्हता निश्चित करण्यांत आली. तथापि वर नमूद केल्याप्रमाणे शासन मान्य अशा डीओइएसीसी, सीडॅक, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, सीइडीटीआय, व महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ या ५ संस्थांतून दि. २४.३.१९९८ ते दि. १०.७.२००० या कालावधीत शासकीय योजनेंतर्गत प्रशिक्षण घेऊन नंतर चाचणी परीक्षा उत्तीर्ण केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांकडे दि. ७.८.२००१ च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार विहीत प्रमाणपत्र नसल्याने त्यांचेकडे संगणक ज्ञान विषयक विहीत शैक्षणिक अर्हता असल्याचे मानण्यांत येत नव्हते. त्यामुळे ज्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाची चाचणी परीक्षा उत्तीर्ण केलेली आहे त्यांची संगणक विषयक शैक्षणिक अर्हता निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार याबाबत आता खालील प्रमाणे निर्णय घेण्यांत येत आहे.

**शासन निर्णय:-**

शासकीय कामकाजात गतीमानता आणण्यासाठी शासकीय खर्चाने संगणक प्रशिक्षण देण्याच्या योजनेंतर्गत शासन मान्य अशा ५ संगणक संस्थेपैकी कोणत्याही संगणक संस्थेतून दि. २४.३.१९९८ ते १०.७.२००० या कालावधीत संगणक प्रशिक्षण घेतलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाची चाचणी परीक्षा (Confirmatory Test) उत्तीर्ण करणे संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयान्वये

पच-८७९(२५००-१०-०२) [कृ.मा.प.

बंधनकारक करण्यांत आलेले आहे. त्यानुसार दि. १.१.२००१ रोजी किंवा त्यानंतर निवड प्रक्रीया सुरु होणाऱ्या पदावरील सेवाभरतीसाठी तसेच सध्या शासकीय सेवेत असलेल्यांसाठी; महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाचे चाचणी परीक्षा (Confirmatory Test) उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र हे संगणक ज्ञान विषयक शैक्षणिक अर्हता म्हणून निश्चित करण्यांत येत आहे. महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाची चाचणी परीक्षा उत्तीर्ण केल्याचे हे प्रमाणपत्र प्राप्त केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी पुन्हा DOEACC अथवा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाची 'CCC' किंवा MS-CIT परीक्षा उत्तीर्ण करणे आवश्यक नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

(नितीन गद्रे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र , नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन वांद्रे (पू.) मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ (मर्यादित)
संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण इमारत १ला मजला,एल्फीन्स्टन टेक्नीकल हायस्कूल परिसर, ३ महानगरपालिका मार्ग,मुंबई ४०००१
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद/महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित, पहिला मजला,व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण इमारत,३ महानगरपालिका मार्ग,मुंबई ४०० ००१.
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).

एच- ८७९ (४५००-१०-०२)

—x—